**राष्ट्रीय कृषि विस्तार व तंत्रज्ञान अभियानाच्या (NMAET) कृषि विस्तार उप अभियानातंर्गत, राज्याच्या कृषि विस्तार कार्यक्रमांमध्ये सुधारणांकरिता सहाय्य (आत्मा) योजना सन २०२३-२४ मध्ये राबविण्यासाठी अनुसूचित जमाती प्रवर्गासाठीचा पहिल्या हप्त्याचा निधी केंद्र हिस्सा रु. ७८.५०५ लक्ष व राज्य हिस्सा रु. ५२.३३६६७ लक्ष असा एकूण रु.१३०.८४१६७ लक्ष इतका निधी चालू वर्षी वितरीत करण्यास मान्यता देणेबाबत..**

## महाराष्ट्र शासन

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : आजमा-२०२३/प्र.क्र.१२१/३-अे,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०००३२
दिनांक : २० जुलै, २०२३

वाचा -
१. केंद्रीय कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय यांचे पत्र क्र. एफ.नं.३६-२८/२०१७-अेई/विस्तार कक्ष, दि.१५.०६.२०२३
२. संचालक (आत्मा), यांचे पत्र क्र. कृआ./आत्मा/वाकृआ/प्रशा. मं./३५४/२०२३, दि.१६.०६.२०२३
३. संचालक (आत्मा), यांचे पत्र क्र. आत्मा/प्र.क्र. १५/लेखा/पुराही/ /३५३/२३, दि. १६.०६.२०२३.
५. कृषि व पदुम विभाग शा. नि. क्र. संकीर्ण-२०२३/प्र.क्र.११९/३-अे, दि.२०/०६/२०२३
६. आदिवासी विकास विभाग शासन निर्णय क्र. बीयुडी-२०२३/प्र.क्र.७/कार्यासन-६, दि.१९.०७.२०२३

प्रस्तावना -

केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय कृषि विस्तार व तंत्रज्ञान अभियानांतर्गत ( NMAET) कृषि विस्तार उप अभियान राबविण्यात येत आहे. सदर उप अभियानात राज्याच्या कृषि विस्तार कार्यक्रमांमध्ये सुधारणांकरिता सहाय्य (आत्मा) ही योजना केंद्र व राज्य शासनाच्या ६०:४० अर्थसहाय्याच्या प्रमाणात राबविण्यात येते. सदर योजना सन २०२३-२४ मध्ये राबविण्यासाठी केंद्र शासनाच्या संदर्भाधीन दि. १५.०६.२०२३ पत्रान्वये दिलेल्या सुचनांस अनुसरुन सदर योजनेचा एकूण रु. ६०१४.५८ लक्ष रकमेचा राज्य कृति विस्तार आराखडा (SEWP) कृषि आयुक्तालयाने उपरोक्त संदर्भाधीन दि. १६.०६.२०२३ रोजीच्या पत्रान्वये शासनास मान्यतेस्तव सादर केला होता. आत्मा योजनेच्या सदर रु. ६०१४.५८ लक्ष रकमेच्या आराखड्यास राज्य प्रकल्प मंजूरी समितीने (SLSC) दि.१७.०५.२०२३ रोजी झालेल्या बैठकीत मान्यता दिली असुन त्यानुसार सदर आराखड्यास विभागाकडून दि. २०.०६.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे.

केंद्र शासनाने सन २०२३-२४ करिता आत्मा योजनेकरिता संदर्भाधीन दि. १५.०६.२०२३ रोजीच्या पत्रान्वये केंद्र हिश्याचा अनुसुचित जमाती प्रवर्गासाठी **रु. ७८.५०५ लक्ष** निधी वितरीत केला आहे, त्यानुषंगाने समरुप राज्य हिश्याचा एकूण **रु. ५२.३३६६७ लक्ष** निधी उपलब्ध करुन

देण्याबाबतचा प्रस्ताव संचालक(आत्मा) यांनी दि. १६.०६.२०२३ च्या पत्रान्वये शासनास सादर केला आहे.

आत्मा अंतर्गत सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात अनुसुचित जमाती प्रवर्गाकरिता अर्थसंकल्पित लेखाशीर्ष **२४०१ A ५१२** अंतर्गत केंद्र हिस्स्याकरिता रु. ६००.०० लक्ष व लेखाशीर्ष **२४०१ A ५२१** अंतर्गत राज्य हिस्स्याकरिता रु. ४००.०० लक्ष इतकी तरतूद करण्यात आली आहे.

त्यानुषंगाने संचालक(आत्मा) यांनी केलेल्या विनंतीस अनुसरुन, सन २०२३-२४ करिता केंद्र पुरस्कृत राज्य कृषि विस्तार कार्यक्रमांना विस्तार विषयक सुधारणा करण्यासाठी सहाय्य उप अभियान (आत्मा) या योजने अंतर्गत अनुसुचित जमाती प्रवर्गासाठी पहिल्या हप्त्याकरिता केंद्र हिस्सा रु. ७८.५०५ लक्ष व राज्य हिस्सा रु. ५२.३३६६७ लक्ष असा एकूण रु. १३०.८४१६७ लक्ष इतका निधी आयुक्त(कृषि) यांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे -

**<u>शासन निर्णय</u>** :-

१. सन २०२३-२४ करिता केंद्र पुरस्कृत राज्य कृषि विस्तार कार्यक्रमांना विस्तार विषयक सुधारणा करण्यासाठी सहाय्य उप अभियान या योजनेच्या अंमलबजावणीसाठी चालू वर्षाकरिता अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी पहिल्या हप्त्याचा केंद्र हिस्सा **रु. ७८.५०५ लक्ष ( रु. अष्ट्याहत्तर लक्ष पन्नास हजार पाचशे फक्त)** व राज्य हिस्सा **रु. ५२.३३६६७ लक्ष (रु. बावन्न लक्ष तेहतीस हजार सहाशे सदुसष्ट फक्त)** असा **एकूण रु. १३०. ८४१६७ लक्ष (रु. एक कोटी तीस लक्ष चौ-याऐंशी हजार एकशे सदुसष्ट फक्त)** इतका निधी सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात आयुक्त(कृषि) यांना बीडीएस प्रणालीवर वितरित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर योजनेकरीता प्रत्यक्ष वितरीत करण्यात येणा-या निधीच्या मर्यादेत योजनेची अंमलबजावणी करावी. सदर योजनेच्या अंमलबजावणीसाठी चालू वर्षाकरिता अनुसूचित जाती प्रवर्गाकरिताचा केंद्र हिश्श्याचा **रु. ७८.५०५ लक्ष( रु. अष्ट्याहत्तर लक्ष पन्नास हजार पाचशे फक्त)** निधी पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

**(अ)** मागणी क्रमांक टी-५, २४०१ पीक संवर्धन, ७९६-अनुसूचित जमाती उपयोजना, (०१) अनुसूचित जमाती क्षेत्राखालील उप योजनांतर्गत योजना, (०१) (१७) - कृषि उन्नती योजना-कृषि विस्तार कार्यक्रमांना विस्तार विषयक सुधारणा करण्याकरिता सहाय्य- उप अभियान (केंद्र पुरस्कृत योजना) (केंद्र हिस्सा ६० %) (अनुसूचित जमाती) (२४०१ अे ५१२), ३३ अर्थसहाय्य

३. तसेच केंद्र हिश्श्यास समरुप राज्य हिश्श्याचा हिस्सा **रु. ५२.३३६६७ लक्ष (रु. बावन्न लक्ष तेहतीस हजार सहाशे सदुसष्ट फक्त)** निधी पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

**(ब)** मागणी क्रमांक टी-५, २४०१ पीक संवर्धन,७९६ - अनुसूचित जमाती उपयोजना, (०१) अनुसूचित जमाती क्षेत्राखालील उप योजनांतर्गत योजना, (०१) (१८)- कृषि उन्नती योजना- कृषि विस्तार कार्यक्रमांना विस्तार विषयक सुधारणा करण्याकरिता सहाय्य- उप अभियान ( केंद्र पुरस्कृत योजना) ( राज्य हिस्सा ४०%) ( अनुसूचित जमाती) ( २४०१ अे ५२१), ३३ अर्थसहाय्य

४. सन २०२३-२४ मध्ये राज्यात सदर योजनेची अंमलबजावणी व सनियंत्रण करण्याच्या दृष्टिने, पुढील अधिकाऱ्यांना नियंत्रण तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

| अ.क्र. | स्तर | नियंत्रण अधिकारी | आहरण व संवितरण अधिकारी |
|---|---|---|---|
| १. | आयुक्तालय स्तर | आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे | सहाय्यक संचालक (लेखा-१), आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे. |
| २. | जिल्हास्तर | संबंधित प्रकल्प संचालक आत्मा | संबंधित जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी कार्यालयातील लेखाधिकारी. |

५. आत्मा कार्यक्रम सन २०२३-२४ साठी अनुसूचित जमाती या प्रवर्गासाठी वितरीत करण्यात आलेला निधीचा केवळ त्याच प्रवर्गासाठी वापर करण्यात यावा.

६. सदर योजनेंतर्गत सन २०२३-२४ मध्ये वितरीत केलेल्या निधीचे लेखापरिक्षीत केलेली उपयोगिता प्रमाणपत्रे ( Audited Utilizaton Certificates ) सत्वर सादर करावीत.

७. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१२४६ /व्यय-१४, दि.१७.०७.२०२३ अन्वये प्राप्त झालेल्या मान्यतेच्या अधिन राहून निर्गमीत करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०७२०१५४३५२५८०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

HEMANT GORAKHNATH MHAPANKAR

Digitally signed by HEMANT GORAKHNATH MHAPANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=1775f5c28a439e88c4c15ab3f88d6a6beb26ad2675a8c7a7ff397b2e5305303d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6756123D309547BB1E152A6AEB6042BDE4040836DF541FD3620CA87FF8E71CC5, cn=HEMANT GORAKHNATH MHAPANKAR
Date: 2023.07.20 15:44:53 +05'30'

**( हे. गो. म्हापणकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रती -**

१.अमुस (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२.सचिव (आदिवासी विकास), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
३.आयुक्त (कृषि) तथा राज्य नोडल अधिकारी आत्मा, कृषि आयुक्तालय,पुणे
४.आयुक्त (आदिवासी विकास), पुणे

५.संचालक ( आत्मा ), कृषि आयुक्तालय,पुणे
६.सर्व जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष आत्मा नियामक मंडळ ( मुंबई शहर व मुंबई उपनगर वगळून )
७.सर्व संचालक, कृषि आयुक्तालय, पुणे
८.सर्व विभागीय कृषि सहसंचालक
९.सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा उपाध्यक्ष आत्मा नियामक मंडळ
१०.संचालक वनामती, नागपूर
११.उप संचालक, आत्मा, सामेती, पुणे
१२.सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे
१३.सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी,
१४.सर्व प्रकल्प संचालक (आत्मा),
१५.महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
१६.कृषि विकास अधिकारी, सर्व जिल्हा परिषद
१७.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१८.महालेखापाल - १/२(लेखा परिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता) मुंबई /नागपूर
१९.वित्त विभाग (का.व्यय-१) (अर्थसंकल्प-१२)(अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई.३२
२०.नियोजन विभाग, कार्यासन - १४१४, १४३१, मंत्रालय, मुंबई.३२
२१.कार्यासन अधिकारी, २-अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
२२.निवड नस्ती (कार्यासन-३अे)